**राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई आणि त्यांचे अधिनस्त सर्व संबंधित कार्यालयात 'दिव्यांग तक्रार निवारण अधिकारी' घोषित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण -२०१९/प्र.क्र. ७४/ग्रा.सं.-४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय (वि.), मुंबई- ३२.
दिनांक- २५ ऑक्टोबर, २०१९

वाचा :- (१) दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६, कलम २३

**शासन निर्णय: -**

१. अन्न, नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण विभागाच्या अखत्यारित 'ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६' अंतर्गत राज्यस्तरावर 'राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई' हे कार्यालय कार्यरत असून राज्य आयोगाची औरंगाबाद व नागपूर येथे खंडपीठ आहेत. तसेच जिल्हास्तरावर एकूण ४० 'जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच' कार्यरत आहेत.

२. दिव्यांग व्यक्ती हक्क अधिनियम, २०१६ च्या कलम २३ च्या तरतूदीनुसार प्रत्येक शासकीय आस्थापनेत 'दिव्यांग तक्रार निवारण अधिकारी' नेमणे आवश्यक आहे. त्यानुसार राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई या कार्यालयासाठी 'प्रबंधक (प्रशासन)', औरंगाबाद व नागपूर खंडपीठ कार्यालयासाठी संबंधित 'प्रबंधक (विधी)' व सर्व जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच कार्यालयाकरिता संबंधित 'प्रबंधक (गट -ब) राजपत्रित' यांना 'दिव्यांग तक्रार निवारण अधिकारी' म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७०५, दि. ३.९.२०१९ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९१०३०१६३७४६१००६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SURESH DNYANDEO REDEKAR

Digitally signed by SURESH DNYANDEO REDEKAR
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=00b6deeb0e386eb5698cc129016108429cd770a158e87c3a2a961
34dccfff610, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=b0c49d4a2d63d7827dd22b5ccbfc134f691b42353bcee544
55b220aff75b429c, ou=FOOD SUPPLY AND CONSUMER PROTECTION
DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SURESH DNYANDEO
REDEKAR
Date: 2019.10.30 16:39:02 +05'30'

**( सु. ज्ञा. रेडेकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३) मा. सभापती, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा. अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा. विरोधी पक्ष नेता, (विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा. विरोधी पक्ष नेता, (विधानसभा), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) मा. मंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.
८) मा. राज्यमंत्री (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे खाजगी सचिव.

९) मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.

१०) प्रधान सचिव (अ.ना.पु.व ग्रा.सं.) यांचे स्वीय सहायक.

११) प्रधान सचिव , सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक

१२) आयुक्त, अपंग कल्याण आयुक्तालय,पुणे./कक्ष अधिकारी (अ.पं-२), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय.

१३) कक्ष अधिकारी (नापु-१२), (अ.ना.पु.व ग्रा.सं.), मंत्रालय, मुंबई.

१४) प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई, नागपूर व औरंगाबाद खंडपीठ.

१५) सर्व प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच.